जिल्हा क्रीडा प्रशिक्षण केंद्राची स्थापना-(जालना)
निधी वितरीत करणेबाबत-(लेखाशिर्ष-२२०४ ५६८२).

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः जिक्रीप्र ३०२५/प्र.क्र.४५/क्रीयुसे-१,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ३१/३/२०२५

**वाचा :-**

१) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांक-क्रीडाधो-३११३/(प्र.क्र.५५/१३)/ क्रीयुसे-३, दिनांक २२ मे, २०१४.
२) सहसंचालक, क्रीडा व युवक सेवा , पुणे यांचे पत्र क्र शिक्रीपी/तरतूद /क्रीप्रकें/निवि/२०२३-२४/ का-१३/९५६ दिनांक ४ फेब्रुवारी २०२५
३) शासन निर्णय , शालेय शिक्षणव क्रीडा विभाग, जिक्रीप्र-२०२५/प्र.क्र २७/क्रीयुसे-१, दिनांक २८ मार्च, २०२५.
४) सहसंचालक, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांचे क्र. शिक्रीपी/तरतूद/क्रीप्रकं/ निवि २०२३-२४/ का-१३/१०७९,दिनांक १२/३/२०२५ रोजीचे पत्र.
५) वित्त विभाग परिपत्रक क्र अर्थसं-२०२४/प्र.क्र८०/अर्थ -३ , दिनांक १७ मार्च, २०२५.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्य क्रीडा क्षेत्रात अग्रगण्य रहावे, नागरिकांमध्ये व्यायामाची आवड जोपासावी, राज्यातील खेळाडूंनी राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय स्तरावर दर्जेदार कामगिरी करण्यासाठी क्रीडा विषयक तंत्रशुध्द प्रशिक्षण, खेळाच्या दर्जात सुधारणा, खेळाडूंना गौरव, दर्जेदार क्रीडा सुविधा या बाबी केंद्रबिंदू मानून खेळाडूंसाठी हितावह योजना राज्यात राबविण्यासाठी क्रीडा धोरण २०१२ तयार करण्यात आलेले आहे. त्यातील शिफारशीच्या अनुषंगाने राज्यातील क्रीडापटूंच्या गुणांना वाव मिळण्यासाठी प्रत्येक जिल्हयात प्रशिक्षणाच्या सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी जिल्हा क्रीडा प्रशिक्षण केंद्र स्थापन करण्यास संदर्भाधीन क्र.१ च्या शासन निर्णयान्वये शासन मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार क्रीडा संचालनालयाच्या संदर्भ क्र.२ येथील प्रस्तावानुसार वितराणाचा प्रस्ताव सादर केला आहे. त्यानुसार संदर्भ क्र .३ येथील शासन निर्णयान्वये निधी वितरीत करण्यात आला आहे.

आता संदर्भ क्र ४ अन्वये क्रीडा संचालनालयाने जिल्हा क्रीडा प्रशिक्षण केंद्र, जालना करिता निधी वितरणाचा प्रस्ताव सादर केला असून त्यानुसार निधी वितराणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

मागणी क्र.ई-३, प्रधान लेखाशिर्ष २२०४, क्रीडा व युवक सेवा, १०४, क्रीडा व खेळ, (१०) क्रीडा प्रशिक्षण केंद्रांची आस्थापना, (१०)(०३), जिल्हा क्रीडा प्रशिक्षण केंद्राची स्थापना (२२०४ ५६८२), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाकरीता सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी अर्थसंकल्पीत तरतूदीमधून खालील परिशिष्ट-अ मधील जिल्हा क्रीडा प्रशिक्षण केंद्राला त्यांच्या नावासमोर दर्शविण्यात आल्यानुसार निधी वितरीत करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

**परिशिष्ट-अ**

| अ.क्र | जिल्हा क्रीडा प्रशिक्षण केंद्राचे नाव | अनुदान मंजूर |
|---|---|---|
| १ | जालना | ९,८८,०००.०० |
| (अक्षरी रुपये नऊ लक्ष अठयाऐंशी हजार फक्त) एकुण | | ९,८८,०००/- |

२. उपरोक्त नमूद जिल्हा क्रीडा प्रशिक्षण केंद्राना पुढील अटींच्या अधीन राहून निधी वितरीत करण्यात यावा.

I. प्रस्तावित कामासाठी उपलब्ध करुन देण्यात येणा-या निधीची सक्षम प्राधिकाऱ्याच्या उपयोगिता प्रमाणपत्रे प्राप्त करून घेण्याची सर्वस्वी जबाबदारी क्रीडा संचालनालयाची राहील.

II. निधी वितरीत करताना विहित कार्यपद्धतीचे अनुपालन करण्यात यावे.

III. वित्त विभाग, शासन परिपत्रक दि.१७.०३.२०२५ मधील परि.५ नुसार सदर लेखाशिर्षाखाली करण्यात येणारा निधी दि.३१.०३.२०२५ पूर्वी खर्ची पडेल याची दक्षता घ्यावी.

IV. उपरोक्त निधी आवश्यकतेनुसार मान्य निकषानुसार खर्च करण्यात यावा. ज्यावेळेस निधी प्रत्यक्ष खर्च करावयाचा त्याच वेळी आंहरीत करावा. शासन लेख्याबाहेर बँक खात्यात हा निधी ठेऊ नये.

V. निधी ज्या कारणासाठी मंजूर करण्यात आलेला आहे, त्याच कारणासाठी खर्च करण्यात यावा. तसेच, वितरीत निधीच्या विनियोगाबाबत आवश्यक उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करण्यात यावे.

VI. निधी वितरणाबाबत वित्त विभागाद्वारे वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेले वित्त विषयक विविध आदेश/नियम/ शासन निर्णय व वित्तीय अधिकार नियमपुस्तिकेतील तरतूदी यांची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी.

३.	उपरोक्त संदर्भात होणारा खर्च मागणी क्रमांक ई-३, प्रधान लेखाशीर्ष २२०४, क्रीडा व युवक सेवा, १०४, क्रीडा व खेळ, (१०) क्रीडा प्रशिक्षण केंद्राची आस्थापना, (१०) (०३) जिल्हा क्रीडा प्रशिक्षण केंद्राची स्थापना (२२०४ ५६८२), अंतर्गत ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) या उद्दीष्टाखालील सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या उपलब्ध तरतूदीतून भागविण्यात यावा.

४.	यासाठी संबंधित जिल्हा क्रीडा अधिकारी/ विभागीय उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, यांना आहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५.	सदर शासन निर्णय, नियोजन विभागाचा अनौ.संदर्भ क्र.२५९/१४७१, दि.२६/३/२०२५ व वित्त विभागाचा अनौ.संदर्भ क्र.५२१/व्यय-५, दि.२९/३/२०२५ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३३११५०१०६५७२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RANSING ANANDRAO DERE

Digitally signed by RANSING ANANDRAO DERE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=9651a3c25d5e1f106e47059f72760ff520f9b00f67c3e9186e40ed4bd4fbaee6, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=41EC78BC14804BABDC24C7FD31BA9FBF63804F499D4335774E27423E40136397, cn=RANSING ANANDRAO DERE
Date: 2025.03.31 15:02:01 +05'30'

(रणसिंग डेरे)
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपालाचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई
३) मा.उपमुख्यमंत्री ( नगर विकास व गृहनिर्माण ) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई
४) मा.उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई
५) मा.मंत्री (क्रीडा व युवक कल्याण), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६) सर्व सन्मा. विधानपरिषद/ विधानसभा सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
७) अपर मुख्य सचिव, (अ.का.) क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
८) मा. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
९) मा. महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
१०) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
११) संबंधित जिल्हा कोषगार अधिकारी,
१२) संबंधित वरीष्ठ कोषागार अधिकारी,
१३) वित्त विभाग (कार्यासन व्यय-५/अर्थसंकल्प-८) मंत्रालय, मुंबई
१४) नियोजन विभाग (कार्यासन-१४७१) मंत्रालय, मुंबई
१५) संबंधित विभागीय क्रीडा उपसंचालक, (क्रीडा व युवक सेवा संचालनालयामार्फत)
१६) संबंधित जिल्हा क्रीडा क्रीडा अधिकारी, , (क्रीडा व युवक सेवा संचालनालयामार्फत)
१७) अवर सचिव, अर्थसंकल्प कार्यासन, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१८) निवड नस्ती (क्रीयुसे-१).